सन २०१७-१८ करिता ताडी अनुज्ञप्त्या
<u>लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे वितरीत करणेबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:टीओडी-०७१७/प्र.क्र.२१९/राउशु-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २१ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :-** १) शासन अधिसूचना, गृह विभाग, दि.४ जून, २००१.
२) शासन अधिसूचना, गृह विभाग, दि.९ ऑगस्ट, २०१०.
३) शासन निर्णय, क्र.टीओडी-०६१५/प्र.क्र.११६/राउशु-३, दि.२५.८.२०१५.
४) शासन निर्णय, क्र.टीओडी-०६१५/प्र.क्र.११६/राउशु-३, दि.२८.१०.२०१६.
५) शासन निर्णय, क्र.टीओडी-०६१५/प्र.क्र.११६/राउशु-३, दि.०२.१२.२०१६.

**प्रस्तावना** :-

महाराष्ट्र ताडी दुकाने (लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे अनुज्ञप्ती देणे) आदेश, २००१ नुसार, संदर्भाधीन दि.२८ ऑक्टोबर, २०१६ च्या तसेच दि.२ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये, ताडी वर्ष २०१६-१७ करिता ताडी दुकाने लिलाव व निविदा पध्दतीने वितरीत करण्याच्या विहित पध्दतीनुसार अटींच्या अधीन राहून टीडी-१ अनुज्ञप्त्यांचे वितरण बोलीधारकांना करण्यात आले आहे.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र ताडी दुकाने (लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे अनुज्ञप्ती देणे) आदेश, २००१ नुसार राज्यातील ताडी अनुज्ञप्त्याकरिता सन २०१७-१८ या वर्षाकरिता पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

१) सन २०१७-२०१८ या वर्षाकरीता ताडी अनुज्ञप्ती लिलाव-नि-निविदा पध्दतीने प्रक्रिया राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) शासन निर्णय, दि.२८.१०.२०१६ व दि.०२.१२.२०१६ नुसार ज्या जिल्हयात सर्व तालुक्यामध्ये किमान १००० परिपक्व झाडांमागे १ दुकान हे धोरण लागू राहील. सदर शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या अटी व शर्ती लागू राहतील.

३) कोकण विभागातील मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे या जिल्हयामध्ये १००० परिपक्व झाडाची अट शिथिल करुन लगतच्या कोकण विभागातील पालघर, रायगड, या जिल्हयातून ताडी आणून विकण्याकरिता विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे. मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे या जिल्हयामधील ताडीचे दुकान मंजूर करतेवेळी कोकण विभागातील पालघर व रायगड या जिल्हयांमध्ये १००० परिपक्व झाडे असल्याबाबतचा पुरावा सादर करणे आवश्यक राहील. मुंबई शहर, मुंबई उपनगरे, ठाणे येथील यशस्वी बोलीधारकांना प्रत्येकी स्वतंत्र १००० परिपक्व झाडे इतर जिल्हयात (पालघर व रायगड) त्यांच्याकडे उपलब्ध असल्याचा पुरावा लिलाव प्राधिकारी यांच्याकडे सादर करणे आवश्यक राहील. यासंदर्भात आवश्यक ती कार्यपध्दती आयुक्त स्तरावर अवलंबविण्यात यावी. तसेच भेसळयुक्त ताडीचे वितरण होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८१९१६०८००७१२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2017.08.21 17:36:07 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
**सह सचिव, गृह विभाग.**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (राउशु), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. खाजगी सचिव, विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
६. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२३,
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. सर्व जिल्हाधिकारी,
९. सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
१०.सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
११.निवड नस्ती.